Evidence Based Project Monitoring System **विकसित करण्याच्या अनुषंगाने आवश्यक तांत्रिक मनुष्यबळ व सल्लागार यांच्या नियुक्तीस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : माविका-२०१६/प्र.क्र. १५/१४१८**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०८ मार्च, २०१७

**वाचा :**

१. नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एफएनएस-३३०५/प्र.क्र.१४२/का-१४३६, दि. १८ ऑक्टोबर, २००६.
२. सामान्य प्रशासन विभाग, (माहिती तंत्रज्ञान संचालनालय), शासन निर्णय क्रमांक: GAD-मातंसं ०८०/४/२०१४-% DIRECTORATE of IT-DIT(MH), दि.१ जुलै, २०१४.
३. नियोजन विभाग शासन निर्णय क्र. : असांस१३१४/ /प्र.क्र.१२८/ का.-१४१, दि.३० मार्च, २०१६
४. अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे आदेश क्र. पीएमएस-२०१६/सल्लानि/२९/इआसं/१०५१, दि. २९ नोव्हेंबर,२०१६

**प्रस्तावना :**

अर्थसंकल्पीय योजनांसाठी एव्हिडंस बेस्ड् फोटोग्राफीद्वारे संनियंत्रण प्रणाली विकसित करण्याबाबतच्या कार्यवाहीचा भाग म्हणून प्रथमत: पथदर्शी प्रकल्प म्हणून सार्वजनिक बांधकाम विभाग, जलसंपदा विभाग व वस्त्रोद्योग विभाग (रेशीम उद्योग) या विभागांसाठी सदर प्रणाली अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने संबंधित प्रशासकीय विभाग व महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र, नागपूर येथील तज्ञ अधिकाऱ्यांच्या सहकार्याने विकसित करण्यात येत आहे. ही प्रक्रिया अंतिम करण्यासाठी तसेच मंत्रालयीन उर्वरित इतर विभागांसाठी ही प्रणाली विकसित करण्याच्या दृष्टीने त्या त्या विभागात सध्या अस्तित्वात/कार्यरत असलेल्या प्रणालींचा अभ्यास करुन व ज्या विभागात प्रणाली उपलब्ध नाही त्या विभागांच्या कामकाजाचा / कार्यक्रम कार्यान्वयनाचा अभ्यास करुन प्रकल्प अहवाल तयार करणे व अनुषंगिक कार्यवाही करण्यासाठी सल्लागार तसेच संगणकीय तांत्रिक मनुष्यबळ नियुक्त करणे आवश्यक ठरते.

२. सल्लागार नियुक्तीच्या संदर्भात RFP (Request For Proposal) तयार करणे व अनुषंगिक कार्यवाही करण्यास संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय यांना प्राधिकृत करण्यात आले होते. त्या अनुषंगाने संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करुन मे. KPMG Limited यांच्या कडून Principal Consultant (०.५ पदे Part Time), Senior Consultant (२ पदे) व Consultant (२ पदे) नियुक्तीबाबत अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने नियोजन विभागास शिफारस केली आहे.

३. संदर्भ क्र.३ येथील नियोजन विभागाच्या शासन निर्णयान्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयास संगणक प्रणाली विकसनासाठी प्रतिमाह दराने तांत्रिक बळ मे. मास्टेक लि. यांचेकडून घेण्याबाबत मान्यता दिली आहे. Evidence Based Project Monitoring System ही संगणकीय प्रणाली विकसीत करण्यासाठी अतिरिक्त ४ जावा डेव्हलपर्सच्या सेवांचीही आवश्यकता असल्याने त्या मे. मास्टेक लि. यांच्याकडून उपरोक्त शासन निर्णयातील प्रतिमाह मनुष्यबळ दराने घेण्याबाबत अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने प्रस्तावित केले आहे.

४. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २९/१०/२००१ च्या शासन निर्णयातील तरतूदी नुसार नियोजन विभागातील संगणकीकरणाचा प्रकल्प राबविण्यासाठी प्रकल्प अंमलबजावणी समिती नियोजन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आली आहे. सदर विकसित करावयाची प्रणाली ही संगणकीय प्रकल्प ठरत असल्याने प्रकल्प अंमलबजावणी समितीने सल्लागार नियुक्तीबाबतच्या प्रस्तावावर विचार करुन KPMG Limited यांचेकडून Principal Consultant (०.५ पदे Part Time), Senior Consultant (२ पदे) व Consultant (२ पदे) संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयानुसार विहीत दराने घेण्यास मान्यता दिली. तसेच मे. मास्टेक लि. यांच्याकडून ४ जावा डेव्हलपर्सच्या सेवा संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयानुसार विहीत दराने घेण्यास मान्यता दिली. प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या निर्णयास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

५. Evidence Based Project Monitoring System (EBPMS) ही संगणकीय प्रणाली विकसीत करण्यासाठी प्रकल्प अंमलबजावणी समितीने दि १८/०१/२०१७ रोजी घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने KPMG Limited यांचेकडून Principal Consultant (०.५ पदे Part Time), Senior Consultant (२ पदे) व Consultant (२ पदे) संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयानुसार विहीत प्रतिमाह मनुष्यबळ दराने व त्यातील सर्व अटी व शर्तीनुसार तर मे. मास्टेक लि. यांच्याकडून ४ जावा डेव्हलपर्सच्या सेवा संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयानुसार विहीत प्रतिमाह मनुष्यबळ दराने व त्यातील सर्व अटी व शर्तीनुसार प्रथमत: सहा महिन्यासाठी घेण्यास व अनुषंगिक खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर नियुक्ती ही प्रथम ३ महिन्यांसाठी करावी व उपरोक्त संदर्भिय(४) च्या आदेशान्वये गठीत मूल्यमापन समितीने कामांचे मूल्यमापन करुन मुदतवाढीबाबत निर्णय घ्यावा.

६. सल्लागार नियुक्ती व जावा डेव्हलपर्सची नियुक्तीची कार्यवाही अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. नियुक्ती करताना अटी व शर्ती कर्तव्ये, कामाची व्याप्ती (Scope

of Work) इत्यादी नमूद करुन आवश्यक तो करारनामा करण्यासाठी संचालनालयास प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. वरील मनुष्यबळ नियुक्तीपोटी येणारा खर्च मागणी क्र. ओ-९, ३४५४ गणना, सर्वेक्षण व सांख्यिकी (०२) सर्वेक्षण व सांख्यिकी, ११२ आर्थिक सल्ला (०३) (०५) इलेक्ट्रॉनिक आकडेवारी संस्करण केंद्र (३४५४०३८५) योजनांतर्गत १० कंत्राटी सेवा या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३०८१२४४५३७९१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish J Moghe

Digitally signed by Satish J Moghe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6230073c6c2b69dbf76e5210974f85eec0496e45eb4319228925521689fc99e6, cn=Satish J Moghe
Date: 2017.03.08 15:38:09 +05'30'

**( सतीश मोघे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री(वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
६) डॉ.डी.बी. पाठक, आय.आय.टी., पवई, मुंबई.
७) संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र, व्हीएनआयटी कॉलेज परिसर,दक्षिण अंबाझरी रोड, नागपूर-४४०००१.
८) उप महासंचालक, नॅशनल इन्फोर्मेटीक्स सेंटर, पुणे
९) संचालक ,अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
१०) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा - पूर्व, मुंबई-५१
११) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) नियोजन विभागातील सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव
१३) निवड नस्ती (का.१४१८), नियोजन विभाग. मंत्रालय, मुंबई-३२.